An I Can Read Book®




Millicent Selsam, Arnold Lobel

# GREG'S MICROSCOPE



# ग्रेगचा सूक्ष्मदर्शक

मिलीसेंट सेलसम, चित्र : अर्नाल्ड लोबल

मराठी : स्वप्नाली नाईक

# ग्रेगचा सूक्ष्मदर्शक

मिलीसेंट सेलसम, चित्र : अर्नाल्ड लोबल

मराठी : स्वप्नाली नाईक



ग्रेगला एक सूक्ष्मदर्शक पाहिजे होता.

"बाबा," तो म्हणाला,

“माझ्यासाठी एक सूक्ष्मदर्शक विकत घ्या.”

“कश्यासाठी पाहिजे तुला?” वडिलांनी विचारले.

“मी त्यातून छोट्या छोट्या वस्तू पाहू शकतो,” ग्रेग म्हणाला.

“तू सूक्ष्मदर्शकाशिवाय छोट्या वस्तू पाहू शकत नाही का?”

वडिलांनी विचारले.





“या बिंदूकडे बघ.

किती छोटा आहे हा.

ही मुंगी बघ.

ही तर खूपच छोटीशी आहे.

अजून काय पहायचं आहे तुला?”



“बरं, ग्रेग म्हणाला.

बिलीकडे एक सूक्ष्मदर्शक आहे.

एका खोक्यामध्ये तो आणला होता

काचेच्या काही स्लाईडसोबत.

कोळ्याच्या पायावरील छोटे केस पण तो पाहू शकतो.

पक्ष्याच्या पंखावरील छोटे छोटे हुक तो पाहू शकतो.

ते खूप छोटे असतात पण सूक्ष्मदर्शकाखाली ते मोठे दिसतात.

मला पण त्या गोष्टी पहायच्या आहेत.”



“तू बिलीच्या सूक्ष्मदर्शकातून पाहू शकत नाही का?”

ग्रेगच्या वडिलांनी विचारले.

“बिली वापरत आहे तो,

मला माझा स्वतःचा पाहिजे आहे.” ग्रेग म्हणाला.



“मला यावर विचार करावा लागेल,” वडील म्हणाले.

“सूक्ष्मदर्शकाची किंमत खूप जास्त असते.”

“हो का?" ग्रेग म्हणाला.

“बिलीच्या वडिलांनी जास्त पैसे नाही दिले.”

“मी त्यांच्याशी बोलेल,” ग्रेगचे वडील म्हणाले.

ग्रेगचे वडील बिलीच्या वडिलांसोबत बोलले.

नंतर त्यांनी एक सूक्ष्मदर्शक खरेदी करायला सुरवात केली.

ते खेळण्यांच्या दुकानात गेले.

नंतर ते मोठे विभाग असलेल्या दुकानात गेले.

जिथे वापरलेले सूक्ष्मदर्शक विकले जातात अश्या दुकानात ते गेले.

एक मोठं खोक घेऊन ते घरी आले.

“ग्रेग," त्यांनी हाक मारली.

“या खोक्यामध्ये काय आहे?" त्याने विचारले.

“उघड ते आणि बघ,” त्याचे वडील म्हणाले.

ग्रेगने खोकं उघडलं.

“व्वा! किती छान सूक्ष्मदर्शक आहे हा,” ग्रेग म्हणाला.



“तूम्हाला खूप पैसे दयावे लागले का?” ग्रेगने विचारले.

“नाही, खूप जास्त नाही,” ग्रेगचे वडील म्हणाले.

ग्रेगच्या वडिलांनी सूक्ष्मदर्शक खिडकीच्या समोर एका टेबलवर ठेवला.

“त्यामधून पहा आता,” ते म्हणाले.

ग्रेग खाली बसला.

त्याने सूक्ष्मदर्शकातून पहिले.



“मला यामध्ये काहीच दिसत नाही.

संपूर्ण अंधार आहे त्यात,” तो म्हणाला.

“खालच्या बाजूला असलेल्या आरश्यावर जोपर्यंत प्रकाश पडत नाही तोपर्यंत त्याला फिरव,” त्याचे वडील म्हणाले.

ग्रेगने आरसा फिरवला.

“मला आता काहीतरी दिसत आहे,” तो म्हणाला.

“बरं ग्रेग, आता त्यातून छोट्याश्या गोष्टी बघ,” त्याचे वडील म्हणाले.

ग्रेग शांत बसला.

“तुम्ही माझ्यासाठी स्लाईड्स आणल्या नाहीत का?”

“नाही ग्रेग,” त्याचे वडील म्हणाले.

“तू स्वतःच छोट्या गोष्टी शोध आणि स्लाईड बनव.”

“काय पाहू आता मी?” ग्रेगने विचारले.

“काय आहे छोटं?”

तो पळत स्वयंपाकघरात गेला.





“आई,” तो म्हणाला, “मला काहीतरी छोट्याश्या गोष्टी दे ज्या मी सूक्ष्मदर्शकातून पाहू शकतो.”

त्याच्या आईच्या हातामध्ये मिठाचा डबा होता.

“मीठ घेऊन बघ,” ती म्हणाली.

ग्रेग पळत गेला आणि एक काचेची स्लाईड घेऊन आला.

त्याने त्यावर थोडं मीठ टाकलं.

नंतर तो ते घेऊन सूक्ष्मदर्शकाकडे गेला.

आणि त्यावर स्लाईड ठेवली.



“थांब,” ग्रेगचे वडील म्हणले.

“ते कसं वापरायचं हे मी तुला दाखवतो.”

जोपर्यंत मीठ दिसत नाही तोपर्यंत त्याचे चाकं कसे फिरवायचे हे त्यांनी ग्रेगला दाखवलं.

“हे मीठ तर मोठया खड्यांसारखं दिसत आहे,” ग्रेग म्हणाला.

“हो,” त्याचे वडील म्हणाले.



“मीठ त्याच्या आधीच्या आकारापेक्षा १०० पट मोठं दिसत आहे.”

“१०० पट मोठं!” ग्रेग म्हणाला.



तेव्हढ्यात ग्रेगची आई आत आली.

“मला पण पाहू दे ते मीठ,” ती म्हणाली.

तिने ही सूक्ष्मदर्शकातून पहिलं.

“अरे बापरे,” ती म्हणाली.

“हे मीठ तर दगडांसारखं दिसत आहे.

ग्रेग स्वयंपाकघरात ये. आपण आणखी छोट्या वस्तू शोधू.”

ग्रेग लगेचच गेला नाही.

तो त्या मिठाकडे पहात राहिला.



"त्यात थोडं पाणी टाक," त्याचे वडील म्हणाले.

ग्रेगने पाणी आणलं आणि मिठावर पाण्याचा एक थेंब टाकला.

नंतर त्याने सूक्ष्मदर्शकातून पाहिलं.

"बाबा," तो ओरडला. "मीठ लहान लहान होत आहे. ते नाहीस होत आहे. ते नाहीस झालं!"





“माझं मीठ नाहीस झालं आहे !” ग्रेग म्हणाला.

“कुठं गेलं ते?”

“ते पाण्यामध्ये गेलं,” त्याचे वडील म्हणाले.

“ती स्लाईड उन्हामध्ये ठेव. तिला कोरडं होऊ दे.”

ग्रेगने ती स्लाईड उन्हामध्ये ठेवली. नंतर त्याने दुसरी स्लाईड घेतली आणि तो स्वयंपाकघरात गेला.

“चल आता आपण साखर पाहू,” ग्रेग त्याच्या आईला म्हणाला.

ग्रेगच्या आईने त्याला थोडी साखर दिली. त्याने ती स्लाईडवर ठेवली.



नंतर ती सूक्ष्मदर्शकातून पाहण्यासाठी तो परत गेला.

“साखरसुद्‌धा ठोकळ्यांसारखी दिसत आहे, परंतु हे ठोकळे मिठाच्या ठोकळ्यांसारखे नाही,” तो म्हणाला.

“त्यात थोडं पाणी टाक,” त्याचे वडील म्हणाले.

“नाही,” ग्रेग म्हणाला. “मीठ नाहीस झालेलं आहे. आता साखरसुद्‌धा नाहीशी होईल.”

“तु ठेवलेली स्लाईड कोरडी झाली आहे का ते पहा,” त्याचे वडील म्हणाले.



ग्रेगने पाहिलं.

“बाबा,” तो म्हणाला.

“मीठ पाण्यातून बाहेर आलं आहे.

ते स्लाईडवर परत आलं आहे.

परंतु आता ते वेगळं दिसत आहे.”

“जेव्हा स्फटिक पाण्यामध्ये तयार होतात तेव्हा ते नीट दिसतात,” त्याचे वडील म्हणाले.

“स्फटिक!” ग्रेग म्हणाला.

“हे काय असतं?”

“त्यांच्याकडे पहा आणि निरीक्षण कर,” त्याचे वडील म्हणाले.





ग्रेगने ती स्लाईड सूक्ष्मदर्शकाखाली ठेवली.

“अरे,” तो म्हणाला.

“हे मीठ आता तर काचेच्या ठोकळ्यांसारखं दिसत आहे.”

“मला पाहू दे आणि आईला बोलावं,” त्याचे वडील म्हणाले .

ग्रेग आईला बोलवायला गेला.

त्याच्या आईने सूक्ष्मदर्शकातून पाहिलं.

“हे एकदम हिऱ्यासारखं दिसत आहे,” ती म्हणाली.

“बरोबर,” ग्रेगचे वडील म्हणाले.

“हिच्यासारखेच साखर आणि मिठाच्या प्रत्येक छोट्या स्फटिकांना धारदार कडा असतात.”

“प्रत्येक स्फटिकांना धारदार कडा असतात का?” ग्रेगने विचारलं.

“हो,” त्याचे वडील म्हणाले.



“चला आपण साखरेचे काही चांगले स्फटिक पाहूया.” ग्रेग म्हणाला.

त्याने साखरेवर थोडं पाणी टाकलं.

नंतर त्याने सूक्ष्मदर्शकातून पाहिलं.

प्रत्येक छोटे ठोकळे लहान लहान होत चालले होते.

“ते नाहिसे होत आहे, नाहीसे होत आहे, नाहीसे झाले,” ग्रेग म्हणाला.

त्याने ती स्लाईड उन्हामध्ये ठेवली.

ती कोरडी झाली होती तेव्हा त्याने ती पहिली.

साखर ही काचेच्या फुलांसारखी दिसत होती.

“किती सुंदर स्फटिक आहे हे,” ग्रेग म्हणाला.

“चला आता आपण मिरपूड पाहू.”

त्याने काही मिरपूड स्लाईडवर ठेवली आणि सूक्ष्मदर्शकातून पाहिलं.

“आता स्फटिक दिसत नाहीत,

मिरपूड ही कचऱ्यासारखी दिसत आहे,” तो म्हणाला.





दुसऱ्या दिवशी शाळेला सुट्टी होती.

ग्रेगचा मित्र बिली घरी आला होता.

“आत ये आणि माझा नवीन सूक्ष्मदर्शक पहा,” ग्रेग म्हणाला.

“हा खूप चांगला सूक्ष्मदर्शक आहे,” बिली म्हणाला.

“मला काही स्लाईड पाहू दे.”

“मी स्वतःच स्लाईड बनवलेल्या आहे,” ग्रेग म्हणाला.

आणि त्याने साखर आणि मिठाच्या बनवलेल्या स्लाईड त्याला दाखवल्या.

बिलीने त्या पहिल्या.

“हे स्फटिक आहेत,” ग्रेग म्हणाला.

“हिऱ्यासारखं साखर आणि मिठाच्या प्रत्येक छोट्या स्फटिकांना धारदार कडा असतात.”

“सगळंकाही स्फटिकांपासून बनलेलं असत का?”

बिलीने विचारलं.

“नाही, ही मिरपूड पहा,” ग्रेग म्हणाला.

बिलीने मिरपुडकडे पाहिलं.

“चल आपण आणखी गोष्टी पाहू,” तो म्हणाला .

“पीठाबद्दल काय वाटतंय तुला?

तू पीठाचा विचार केला का?

लोणी आणि दुधाविषयी काय वाटतंय तुला?”

“एका वेळी एकच पदार्थ पाहू,” ग्रेग म्हणाला.

तो थोडं पीठ घेऊन आला आणि ते स्लाईडवर ठेवलं.

“त्यात एक थेंब पाणी टाक,” बिली म्हणाला.

“पीठ पाण्यात विरघळून जाईल का?” ग्रेगने विचारलं.

“मला माहित नाही,” बिली म्हणाला.

ग्रेगने पिठावर थोडं पाणी टाकलं.



त्याने सूक्ष्मदर्शकातून पाहिलं.

“नाही,” तो म्हणाला.

“पीठ तिथंच राहिलं आहे.”

“तुझ्याकडे त्यावर ठेवण्यासाठी काचेचं झाकण नाही का?” बिलीने विचारलं.

“त्यावर एक काचेचं झाकण ठेव.”

“का?” ग्रेगने विचारलं.

“तुला ते जास्त चांगलं दिसेल,” बिली म्हणाला.



ग्रेग त्यावर काचेचं झाकण ठेवत असताना बिलीने पाहिलं.

“एकदम धपकन टाकू नको,” तो म्हणाला.

“का नको?” ग्रेगने विचारलं.

“त्यावर खूप सारे हवेचे फुगे तयार होतील,” बिली म्हणाला.

“छान! मला पहायचं आहे ते कश्यासारखं दिसतं,” ग्रेग म्हणाला.

“हो, तुला दिसेल ते,” बिली म्हणाला.

“काचेचे झाकण जोरात टाक त्यावर,” बिली म्हणाला.

ग्रेगने तसंच केलं.

नंतर त्याने स्लाईडवर पाहिलं.

“हे मोठे काळे वर्तुळ कसले आहेत?” ग्रेगने विचारलं.

“हवेचे फुगे,” बिली म्हणाला.

“मला आवडले ते!” ग्रेग म्हणाला.

“पीठ कुठं आहे?”

“मला पाहू दे,” बिली म्हणाला.

“ते छोटे स्पष्ट दिसणारे नक्कीच पीठ असेल.”



आणि तेव्हाच ग्रेगची आई आतमध्ये आली.

“पीठ?” ती म्हणाली.

“मला पाहू दे ते कसं दिसतं.

मला काळे वर्तुळं दिसत आहेत.”

“ते हवेचे फुगे आहेत,” ग्रेग म्हणाला.



“फुग्यांच्यामध्ये पहा.

तुला तिथे छोटंसं स्पष्ट काहीतरी दिसेल,

तेच पीठ आहे.”

“ग्रेग, तुला सर्वकाही माहित आहे,” त्याची आई म्हणाली .

“नाही, खूप जास्त नाही माहित,” ग्रेग म्हणाला.

त्याने बिलीकडे पाहिलं.

ग्रेगची आई शिलाई करण्यासाठी गेली.

ग्रेग आणि बिली वेगवेगळे पदार्थ शोधू लागले.

त्यांनी सुक्षमदर्शकातून लोणी पाहिलं.

त्यांनी दूध पाहिलं.

धुळीचे कण पहिले.

प्रत्येक मिनिटाला ग्रेगची आई त्यांना बोलताना ऐकत होती की,



“अरे ह्याच्याकडे पहा.”

“व्वा! हे बघ.”

नंतर ते तिच्या शेजारी उभे होते.

“आम्ही तुझ्याकडे असलेला धागा पाहू का?” त्यांनी विचारलं.



“हो नक्कीच,” ती म्हणाली.

“हा कॉटनच्या धाग्याचा तुकडा घे.”

ग्रेगने तो धागा घेतला.



त्याने एक स्लाईड बनवली आणि ती सूक्ष्मदर्शकातून पहिली.

“हे तर आतापर्यंतच्या स्लाईडपेक्षा खूपच छान आहे,” तो म्हणाला.

“बिली हे पहा.

आई तू पण पहा.”

ग्रेगच्या आईने पाहिलं.

बिलीनेही पाहिलं.

एका कॉटनच्या धाग्यामध्ये खूप साऱ्या धाग्यांचा पीळ घातलेला होता.

“हे खूपच आश्चर्यकारक आहे,” ग्रेगची आई म्हणाली.

“माझ्याकडचा लोकरीचा धागा घेऊन पहा.”

ग्रेगने एक लोकरीचा तुकडा घेतला आणि सूक्ष्मदर्शकाखाली ठेवला.

एका लोकरीच्या धाग्यामध्ये खूप साऱ्या धाग्यांचा पीळ होता.



“परंतु बिली हे पहा,”  ग्रेग म्हणाला.

“या लोकरीच्या धाग्यांपैकी एका धाग्याकडे पहा.

त्याच्यावर सगळीकडे खवले आहेत,  माश्यांच्या खवल्यांसारखे.”

बिलीने पाहिलं.

“हो,” बिली म्हणाला.

“कदाचित सगळेच केस तसे दिसत असतील.”



“केस!” ग्रेग ओरडला.

“केसांचा लोकरीशी काय संबंध आहे?”

“विचार कर,” बिली म्हणाला.

“लोकर कुठून येते?”

ग्रेग विचार करू लागला.

“मेंढ्यांपासून,” ग्रेग ओरडला.

“आता मला कळालं, लोकर हे मेंढ्याचे केस असतात.”

सोमवारी ग्रेग शाळेतून घरी आला.

त्याचेकडे एक कल्पना होती.

“मी आता वेगवेगळे केस सूक्ष्मदर्शकातून पाहणार आहे,” तो त्याच्या आईला म्हणाला.

त्याने त्याच्या डोक्यतून एक केस ओढून काढला.

“आता मी पाहतो हे कसं दिसतं,” तो म्हणाला.

त्याने एक स्लाईड बनवली.

आणि केस पहिला.

“तो केस लोकरीसारखाच दिसतोय का?”

त्याच्या आईने विचारलं.

ग्रेगने आईकडे पाहिलं.





“मी मेंढी नाही,” तो म्हणाला.

“परंतु माझ्या केसांनाही खवले आहेत.”

“ग्रेग,” त्याची आई म्हणाली.

“मी विचार करतेय की कुत्र्याचे केस कसे दिसतील.”

“आई,” ग्रेग म्हणाला.

“मी जसा विचार करतोय तसाच विचार तु पण करतेय,

मी कुठे शोधू कुत्रा?”



आणि तेव्हाच दरवाजाची बेल वाजली.

ग्रेगने दार उघडलं.

“मी आत येऊ का?” मिसेस ब्रूमने विचारलं.



ग्रेगने तिच्या कुत्र्याकडे पाहिलं.

“हो नक्कीच मिसेस ब्रूम या आत या,” ग्रेग म्हणाला.

“नमस्ते मिसेस ब्रूम,” ग्रेगची आई म्हणाली.

“ग्रेग! कुत्रा!

मिसेस ब्रूम आम्हाला कोकोचा एखादा केस मिळेल का?

ग्रेगला तो सुक्ष्मदर्शकातून पहायचा आहे.”



“हो जर असं असेल तर,” मिसेस ब्रूम म्हणाल्या.

आणि त्यांनी त्यांच्या कोट्याच्या बाहीकडे पाहिलं.

“हे घे इकडे आहेत काही केस,” त्या म्हणाल्या.

ग्रेगने ते केस घेतले.

त्याने स्लाईडवर थोडं पाणी टाकून त्यावर ते केस ठेवले आणि काचेचं झाकण टाकलं.

ग्रेगने स्लाईड पहिली.

“मला पाहू दे,” त्याची आई म्हणाली.

“मला माझ्या कुत्र्याचे केस पहायचे आहे,” मिसेस ब्रूम म्हणाल्या.



“एकावेळी एकानेच पहा,” ग्रेग म्हणाला.

मिसेस ब्रूमने पाहिलं.

त्याच्या आईनेही पाहिलं.

“माझा विश्वासच बसत नाहीये,” मिसेस ब्रूम म्हणाल्या.



“एक छोटासा केस एका लांब खांबासारखा दिसतोय.”

ग्रेगने कोकोकडे पाहिलं.

“तुला नाही पहायचं का?” त्याने विचारलं.



पण कोकोने फक्त शेपटी हलवली.

“माझ्या टिचरने मला माझा सूक्ष्मदर्शक शाळेत घेऊन यायला सांगितलं आहे,” एक दिवस ग्रेग त्याच्या आईला म्हणाला.

“त्यांच्याकडे नाही का एखादा?” त्याच्या आईने विचारलं.

“नाही, आमच्या वर्गात नाही,” ग्रेग म्हणाला.

“बरं, पण एकदम काळजीपूर्वक घेऊन जा तो,” त्याची आई म्हणाली.

ग्रेगने सूक्ष्मदर्शक शाळेत नेला.

जेव्हा तो घरी आला तेव्हा तो आईला म्हणाला, “आई, आम्हाला टीचरने दाखवलं की सगळ्या सजीव गोष्टी पेशींपासून कश्या तयार झाल्या आहेत.

“पेशी?” ग्रेगची आई म्हणाली.



“हो,” ग्रेग म्हणाला.

“पेशी या अश्या आहेत की ज्यापासून सगळ्या सजीव गोष्टी तयार झाल्या आहेत.”

“बरं, मग दाखव मला,” ग्रेगची आई म्हणाली.

“चल, आपण एक कांदा घेऊ,” ग्रेग म्हणाला.

त्याने कांद्याचा एक पातळ तुकडा सोलून काढला.

त्याने त्याची स्लाईड बनवली आणि पाहिलं.

“बघ,” तो म्हणाला.

“तिथे पेशी दिसत आहेत.”

ग्रेगच्या आईने पाहिलं.



“हे तर भिंतीमध्ये असणाऱ्या विटांसारखे दिसत आहे,”

ती म्हणाली.



“मी तुला माझ्या पेशी दाखवतो,” ग्रेग म्हणाला.

“स्वतःला कापून नको घेऊस,” त्याची आई म्हणाली.

“नाही, तू फक्त बघ.”

ग्रेगने एक दात कोरण्याची काडी घेतली.

त्याचं एक टोक त्याने तोडांमध्ये चोळलं.





नंतर त्याने तेच टोक एक थेम्ब पाण्यात स्लाईडवर चोळलं.

त्याने त्यावर झाकण ठेवलं.

नंतर त्याने सूक्ष्मदर्शकातून पाहिलं.

“आई इकडे ये,” तो म्हणाला.

“इथे माझ्या स्वतःच्या पेशी आहेत.”

त्याच्या आईने पाहिलं.

“किती छान आहेत या पेशी,” ती म्हणाली.



ग्रेगला नवीन कल्पना सुचली होती.

“मी माझ्या फिश टँक मधील पाने आता सूक्ष्मदर्शकातून पाहणार आहे,” तो म्हणाला.

“कदाचित तिथेसुद्धा मला पेशी दिसतील.”

ग्रेगने फिश टँक मधून एक पान घेतलं आणि त्याची स्लाईड बनवली.



“हिरव्या रंगाच्या विटा!”

त्याने त्याच्या आईला बोलावलं.

नंतर त्याने पानाच्या कडा पाहण्यासाठी स्लाईड थोडी फिरवली.

“इथे काहीतरी हालचाल होत आहे,” तो ओरडला.

आणि तेव्हाच ग्रेगचे वडील घरी आले.

“रात्री जेवायला काय बनवलं आहे?” त्याने विचारलं.

“मला खूप भूक लागली आहे.”

ग्रेगची आई स्वयंपाकघरात गेली.

“जेवण लवकरच तयार होईल,” ती म्हणाली.

“ग्रेगच्या सूक्ष्मदर्शकातून काय दिसत आहे ते पहा.”

“इथे बघा,” ग्रेग म्हणाला.

“आतापर्यंत तुम्ही बघितलेल्यापैकी सर्वात व्यस्त जागा आहे ही.”

ग्रेगच्या वडिलांनी पाहिलं.

“ग्रेग, हे सगळे प्राणी आहेत,” ते म्हणाले.

“आणि प्रत्येक प्राणी हा फक्त एकाच पेशीपासून बनलेला आहे.”



“मी आत्ताच पेशींविषयी शिकलो आहे,” ग्रेग म्हणाला.

“परंतु मला हे माहित नव्हतं की फक्त एका पेशीपासून एखादा प्राणी बनलेला असू शकतो!

त्या एका पानावर नक्कीच असे शंभर प्राणी असतील.”

त्याचे वडील सूक्ष्मदर्शकातून पहातच राहिले.



ते खूप वेळ पहातच होते.

ग्रेग वाट पहात होता.

नंतर त्याची आई त्या खोलीमध्ये आली.

“तू हे पाहिलं का?”

ग्रेगच्या वडिलांनी विचारलं.

“नाही, मला पाहू द्या.”

ती ते पाहण्यासाठी खाली बसली.

ग्रेग वाट पहात होता.



नंतर त्याने त्याच्या वडिलांकडे पाहिलं.

“मी तुम्हाला सांगितलं होतं की मला एक सूक्ष्मदर्शक हवा होता,” ग्रेग म्हणाला.

“पण माझं चुकीचं होतं,

मला वाटतं आपल्या कुटुंबासाठी तीन सूक्ष्मदर्शक गरजेचे आहेत.”

An I Can Read Book®

# ग्रेगचा सूक्ष्मदर्शक

ग्रेगला एक सूक्ष्मदर्शक पाहिजे होता. तो खूप दिवसांपासून त्याची वाट पहात होता. जेव्हा त्याला सूक्ष्मदर्शक मिळाला तेव्हा त्याने छोट्या छोट्या वस्तूंचं एक नवीन विश्व शोधून काढलं. आणि त्या सगळ्या वस्तू त्याच्या घरातच होत्या.

ग्रेग सूक्ष्मदर्शकातून मीठ, साखर, धागा आणि केस पहातो. त्याचे आई - वडीलही त्याच्या या शोधात सहभागी होतात.

शेवटी ग्रेग विचार करतो की, संपूर्ण कुटुंबासाठी फक्त एक सूक्ष्मदर्शक पुरेसा असेल का?